कायम प्रवासभत्ता/मर्यादित प्रवासभत्ता बाबतचे पुनर्विलोकन ----

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
परिपत्रक क्रमांक प्रवास-1092/सीआर 260/सेवा-5,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 29 सप्टेंबर 1992.

## परिपत्रक

12 NOV 1992

शासनाकडे आलेल्या बऱ्याचशा संदर्भामध्ये असे निदर्शनास आणले आहे की, कायम प्रवास भत्याची पद्धत बंद केल्यामुळे प्रवासभत्ता देयके करण्याचे काम वाढले आहे व त्यामुळे बरीचशी देयके प्रलंबित रहात असल्याने कर्मचाऱ्यांची देयके अदा करण्यास उशिर होतो. या मुद्यांचा विचार करता, कायम प्रवासभत्ता पद्धतीचा फेरआढावा घेण्याचे झाल्यास, त्या करता, गेल्या पाच वर्षातील, मुंबई नागरी सेवा नियम 383 वा अन्य अशाच तरतूदीमध्ये प्रदान होत असलेल्या प्रवासभत्ता बिलांचे तपशीलवार विश्लेषण करावे लागेल. तरी, मुंबई नागरी सेवा नियम 383 खाली वा अशाच तरतूदीमध्ये प्रवासभत्ता घेणाऱ्या सर्व कार्यालय प्रमुखांनी त्यांचे स्वतःचे बाबत, तसेच त्यांच्या कर्मचारी वृंदाबाबतचा, गेल्या पाच वर्षाच्या कालावधीतील या नियमाखालील प्रवासभत्ता बिलांचा तपशील सोबतच्या प्रपत्रात भरुन आपल्या प्रशासकीय विभागाकडे अभिप्रायासह दिनांक 1 जानेवारी 1993 पूर्वी पाठवावा. प्रशासकीय विभागांनी त्यांचेकडे येणारी माहिती एकत्रित करुन आपल्या अभिप्रायासह व आवश्यक त्या आदेशांच्या प्रतीसह वित्त विभागाकडे दिनांक 1 मार्च 1993 पूर्वी पाठवावी. सदर माहिती विहीत कालमर्यादेत उपलब्ध झाल्यास शासनाला याबाबत निर्णय घेणे सुलभ होईल. वरील कालमर्यादा कसोशीने पाळण्यात यावी. प्रलंबित देयकांची माहिती उपलब्ध करुन देतांना अनुदान संपल्यामुळे प्रलंबित राहिलेल्या देयकांचा समावेश नसावा.

वि. वि. फाटक,
अवर सचिव, वित्त विभाग.

प्रतः

मंत्रालयाचे कृषि व पदुम विभाग, पाटबंधारे विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, सार्वजनिक आरोग्य विभाग, ग्राम विकास विभाग, महसूल व वन विभाग व उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग व त्यांचे अधिनस्त असलेले विभाग प्रमुख, प्रादेशिक प्रमुख व कार्यालयांचे प्रमुख.
वित्त विभागातील सर्व कार्यासने.
निवड नस्ती, कार्यासन सेवा-5, वित्त विभाग.

(कृ.मा.प.)

शामसु-रोटा-विवि-एच-720(7,000-11-92)

## प्रपत्र

कार्यालयाचे नाव:

प्रशासकीय विभाग:

| क्र. | कर्मचाऱ्यांचा प्रवर्ग | प्रवर्गातील कर्मचाऱ्यांची संख्या | प्रवर्गातील कर्मचाऱ्यांची वेतनश्रेणी | कर्मचाऱ्यांचे कार्यक्षेत्र तालुका, जिल्हा, गावाचा समुह (त्याचे अंदाजे क्षेत्र कि.मी. मध्ये) | शा.नि.,वि.वि., दिनांक 3 आक्टोबर 1988 चे आदेश होण्याआधी कायम प्रवासभत्ता/नियंत्रित खुला प्रवासभत्ता देय होता? | कायम प्रवासभत्ता नियंत्रित खुला प्रवासभत्ता दर व तो मंजूर करणाऱ्या आदेशाचा क्रमांक, दिनांक वगैरे | | महिन्याची सरासरी फिरती (किलोमीटरमध्ये) | विहीत अट असल्यास, अटीप्रमाणे महिन्यातून कमीत कमी किती दिवस/रात्री फिरतीवर रहावे लागते. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | 30-10-88 चे आदेशापूर्वी | 3-10-88 चे आदेशानंतर | | |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 |
| | | | | | | | | | |

| सर्वसाधारण नियमानुसार होणारी महिन्याची सरासरी प्रवास भत्याची रक्कम | सध्याच्या वित्तिय मर्यादेनुसार जास्तीत जास्त अनुज्ञेय असलेली रक्कम | मुंबई नागरी सेवा नियम-383 खाली वा अन्य अशाच तरतुदीमध्ये प्रवासभत्ता घेणाऱ्या किती कर्मचाऱ्यांची गेल्या पाच वर्षातील देयके प्रलंबित आहेत. | या नियमाखाली प्रवासभत्ता देयके मंजूर करण्यात लागणाऱ्या विलंबाची कारणे | प्रशासकीय विभागाचे अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| 11 | 12 | 13 | 14 | 15 |
| | | | | |